**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०१६/प्र.क्र.४२७/प्रशा-१**

२ रा मजला (मुख्य इमारत),
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ मे, २०२२

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १० सप्टेंबर, २००१
२) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्र.आढावा-२००१/प्र.क्र.१०९/प्रशा-१, दिनांक ०५ मार्च, २००३
शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्र.इएसई-२००७/प्र.क्र.१७१/प्रशा-१, दिनांक ०३ जून, २००८
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण-१००७/५४६/१८ (र.व का.), दिनांक ०८ सप्टेंबर, २०१०
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.संकीर्ण-१००७/५४६/१८ (र.व का.), दिनांक ०८ ऑक्टोबर, २०१२
६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.एईओ-१०१५/प्र.क्र.०६/२०१५/दहा, दिनांक १५ जानेवारी, २०१५
७) शासन निर्णय, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्र.कौविउ-२०१५/प्र.क्र.०७/प्रशा-१, दिनांक ११ जून, २०१५
८) शासन निर्णय, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्र.कौविउ-२०१५/प्र.क्र.१९०/प्रशा-१, दिनांक ०२ सप्टेंबर, २०१५
९) शासन निर्णय, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्र.कौविउ-२०१५/प्र.क्र.१९६/प्रशा-१, दिनांक २४ फेब्रुवारी, २०१६
१०) शासन निर्णय, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्र.कौविउ-२०१६/प्र.क्र.३६०/प्रशा-१, दिनांक १८ ऑक्टोबर, २०१६
११) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१६
१२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आ.पु.क., दिनांक ०९ जून, २०१७
१३) शासन निर्णय, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, क्र.कौविउ-२०२०/प्र.क्र.९९/प्रशा-१, दिनांक २५ फेब्रुवारी, २०२२

**प्रस्तावना -**

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग हा रोजगार व स्वयंरोजगार विभाग म्हणून कार्यरत असतांना संदर्भ २ येथील शासन निर्णयान्वये विभागातील पदांचा आढावा घेऊन नवीन पदे निर्माण करण्यास तसेच, व्यपगत झालेली पदे पुनरुज्जिवित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच, संदर्भ क्र.३ ते ५ येथील शासन निर्णयान्वये विभागातील पदांचे सवंर्ग रुपांतरण/पदे रद्द/पुनर्जिवीत करण्यात आली आहेत.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये तत्कालिन रोजगार व स्वयंरोजगार विभागाचे नाव कौशल्य विकास व उद्योजकता विभाग असे करण्यात आले आहे व विभागासाठी प्रधान सचिव श्रेणीचे १ पद निर्माण करण्यात आले आहे. तसेच, संदर्भ क्र.७ येथील शासन निर्णयान्वये १४ पदे नव्याने निर्माण करण्यात आली आहेत.

विभागाच्या संदर्भ क्र.८ येथील शासन निर्णयान्वये उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या अधिनस्त असेलेली व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संबंधित कार्यासने एकूण २२ पदांसहीत या विभागाच्या अधिनस्त आलेली आहेत. तसेच, संदर्भ क्र.९ येथील शासन निर्णयान्वये विशेष कार्य अधिकारी (उप सचिव दर्जा) या संवर्गातील २ व निम्नश्रेणी लघुलेखकांची २ अशी एकूण ४ पदे निर्माण करण्यात आली आहेत. आणि संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयान्वये शिपाई संवर्गाचे १ पद व्यपगत करण्यात आले आहे.

संदर्भ क्र.१३ येथील शासन निर्णयान्वये विभागाचे नामकरण कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग असे करण्यात आले आहे.

संदर्भ १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनाच्या अखत्यारितील सर्व शासकीय कार्यालयांतील पदांचा आढावा घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याबाबत धोरण विहित करण्यात आले आहे. यानुसार संदर्भ ११ अन्वये सर्व शासकीय कार्यालयातील पदांचा नव्याने आकृतीबंध निश्चित करण्याबाबत सूचना देण्यात आल्या. सुधारित कार्यपद्धतीनुसार आकृतीबंधास प्रथम संदर्भ १२ अन्वये गठीत करण्यात उपसमितीपुढे प्रस्ताव सादर करुन उप समितीच्या शिफारशींसह सुधारित आकृतीबंधाचा प्रस्ताव उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत. त्यानुसार या विभाग (खुद्द) च्या सुधारित आकृतीबंधाचा प्रस्ताव अपर मुख्य सचिव(सेवा), सामान्य प्रशासन विभाग व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग यांच्या उपसमितीच्या दिनांक २९.०७.२०२१ रोजीच्या बैठकीत विचारार्थ सादर करण्यात आला. सदर समितीच्या शिफरशींसह सदरचा प्रस्ताव उच्चस्तर सचिव समितीच्या दिनांक २६.०८.२०२१ रोजीच्या बैठकीत मान्यतेसाठी सादर करण्यात आला. उच्चस्तर सचिव समितीने कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या सुधारित पदांच्या आकृतीबंधास दिलेल्या मान्यतेनुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

दिनांक २६.०८.२०२१ रोजीच्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेस अनुसरुन कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभागाच्या सुधारित पदांच्या आकृतीबंधास सोबतच्या परिशिष्ट "अ" व "ब" मध्ये दर्शविल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. (परिशिष्ट "अ" मध्ये नियमित पदे व परिशिष्ट "ब" मध्ये बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यात येणाऱ्या पदांचा तपशिल दर्शविण्यात आला आहे.)

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीनुसार अनौपचारिक संदर्भ क्र.१६५/आपुक, दिनांक २२.०४.२०२२ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०५०४१२३८१०२१०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्पाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANGEETA AJIT SHINDE

Digitally signed by SANGEETA AJIT SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT ENTREPRENEURSHIP AND EMPLOYMENT DEPARTMENT,
2.5.4.20=ba607066e7a34e428b7c7c73de0f7e09a315a2af5075fd47f1e08389aa137b81, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DDF4C16E4A3043BBAA409E4ECF901CA0490CE93C66913DE88A7769927FF5E261, cn=SANGEETA AJIT SHINDE
Date: 2022.05.04 12:39:06 +05'30'

**(संगीता शिंदे)**
**शासनाच्या कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा.मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव
२. महालेखाकार-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
३. महालेखाकार-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
४. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
८. सर्व कार्यासने
९. निवडनस्ती (प्रशा-१)

**(शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१६/प्र.क्र.४२७/प्रशा-१, दिनांक ०४ मे २०२२ चे सहपत्र)**

## परिशिष्ट "अ"

## (नियमित पदे)

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी ( ₹) | मंजूर पदे | सुधारित आकृतीबंध मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव | संवर्ग पद | १ | १ | -- | -- |
| २ | सह सचिव/ उपसचिव | S-२७: ११८५००-२१४१००<br>S-२५: ७८८००-२०९२०० | ३ | ३ | १ | -- |
| ३ | विशेष कार्य अधिकारी (उपसचिव दर्जा गट-अ) | S-२५: ७८८००-२०९२०० | २ | २ | - | -- |
| ४ | अवर सचिव | S-२३: ६७७००-२०८७०० | ३ | ३ | २ | -- |
| ५ | वरिष्ठ स्वीय सहायक | S-२३: ६७७००-२०८७०० | १ | १ | - | -- |
| ६ | कक्ष अधिकारी | S-१७: ४७६००-१५११००<br>(S-२०: ५६१००-१७७५००) (नियमित ४ वर्षांच्या सेवेनंतर अकार्यत्मक वेतनश्रेणी ) | ८ | ८ | २ | -- |
| ७ | निवडश्रेणी लघुलेखक (इंग्रजी) | S-१६: ४४९००-१४२४०० | १ | १ | - | -- |
| ८ | उच्च श्रेणी लघुलेखक | S-१५: ४१८००-१३२३०० | २ | २ | - | -- |
| ९ | रोख लेखापाल | S-१४: ३८६००-१२२८०० | ० | १ | - | -- |
| १० | सहायक कक्ष अधिकारी | S-१४: ३८६००-१२२८०० | १६ | १६ | ७ | -- |
| ११ | संगणक सहायक/ संशोधन सहायक | S-१४: ३८६००-१२२८०० | ३ | २ | - | -- |
| १२ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | S-१४: ३८६००-१२२८०० | ३ | ३ | - | -- |
| १३ | लघुटंकलेखक (इंग्रजी व मराठी) | S-८: २५५००-८११०० | १ | १ | - | -- |
| १४ | लिपिक/लिपिक-टंकलेखक | S-६: १९९००-६३२०० | १५ | १५ | ५ | -- |
| १५ | वाहन चालक | S-६: १९९००-६३२०० | १ | १ | - | -- |
| १६ | शिपाई | S-१: १५०००-१७६०० | ५ | ४ | ४ | |
| | **एकूण** | | **६५** | **६४** | **४७** | |

**(शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१६/प्र.क्र.४२७/प्रशा-१, दिनांक ०४ मे २०२२ चे सहपत्र)**

## परिशिष्ट “ब”

## (बाह्ययंत्रणेद्वारे भरावयाची पदे)

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | मंजूर पदे | सुधारित आकृतीबंध मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | वाहन चालक | बाहययंत्रणेद्वारे | १ | १ | - | १ |
| २ | शिपाई | बाहययंत्रणेद्वारे | १ | २ | - | २ |
| | **एकूण** | | **२** | **३** | **--** | **३** |